# पेंग्विन येत आहेत!



लेखक: आर. एल्. पेनी    चित्रे: टॉम इटॉन

# पेंग्विन येत आहेत!



मराठी अनुवाद: सुशील मेन्सन



पेंग्विन पक्षी असतात.

त्यांना पंख असतात आणि ते अंडी घालतात.

त्यांचे पंख फर (अंगावरील लव) सारखे दिसतात, कारण ते पंख खूप छोटे असतात आणि खूप जवळजवळ असतात.

पेंग्विन समुद्रात पोहतात तेव्हा त्यांचे पंख त्यांना ऊबदार आणि कोरडे ठेवतात.

पेंग्विन अठरा प्रकारचे असतात.

मला *अॅडेली* पेंग्विनबद्दल शिकायचं होतं,

म्हणून मी अंटार्क्टिकाला गेलो.

मी दक्षिणेला जाणाऱ्या एका मोठ्या

जहाजातून प्रवास केला.



आम्हाला *पॅक आइस* (बर्फाचे तुकडे) मधून प्रवास करावा लागला.

पॅक आइस म्हणजे अंटार्क्टिकाच्या मुख्य भूभागाभोवती पाण्यावर तरंगणारा बर्फ.

वसंत ऋतू आला की अॅडेली पेंग्विन पॅक आइस प्रदेश सोडून देतात.

ते अंटार्क्टिका मुख्य भूभागाच्या किनाऱ्यावर मीलनासाठी येतात आणि अंडी घालतात.

खूप दगड असलेल्या ठिकाणी पेंग्विन गोळा होतात.

तिथेच ते त्यांची घरटी बनवतात.

त्यांना *रुकरी* असं म्हणतात.

आपली घरटीं बनवण्यासाठी ते छोटे दगड वापरतात.





कुणाचा बरं आवाज आहे हा?

तो *आर्क*च्या आवाजासारखा वाटला.

पेंग्विनच असले पाहिजेत!

मी किनाऱ्याकडे धावलो.

मला खूप साऱ्या दगडांचा ढिगारा असलेला एक खडकाळ किनारा सापडला. हे नक्की रुकरी असणार!

प्राण्यांबद्दल जाणून घ्यायचा सर्वोत्तम मार्ग म्हणजे त्यांच्यासोबत राहायचं. मी बर्फावरून घसरत जाणाऱ्या गाडीवर *(स्लेज)* एक घर बनवलं.

ते स्लेज मी रुकरीनजिक नेलं आणि वाट पाहू लागलो.



मला मैलोनमैल पसरलेली बर्फाची चादर दिसली.

जाडजूड बर्फातून छोटे छोटे काळे बिंदू हळूहळू पुढे चालत होते.

एक बिंदू दुसऱ्या बिंदुच्या मागे मागे चालत होता, रेल्वेच्या डब्यांसारखं.





अ‍ॅडेली पेंग्विन फक्त चौदा इंच (एक फुटापेक्षा थोडेसे जास्त) उंच असतात.

त्यांचं वजन चौदा पौंड (सात किलो) असतं. हे वजन मानवाच्या नवजात बाळाच्या दुप्पट असतं.

बर्फाची जाडी दहा इंच (एक फुटापेक्षा थोडीशी कमी) असते.

या जाडजूड बर्फात चालण्यासाठी पेंग्विनला खूप कष्ट पडतात.

पहिला पेंग्विन थकला की दुसरा पेंग्विन नेतृत्व करतो.

मी बर्फात चालण्यासाठी त्यांना काही मदत करू शकतो का?

मी त्यांच्यापाशी चालत गेलो.

ते वीस फूट दूर अंतरावर थांबले आणि त्यांनी आवाज केला *आर्क*.

मी वळलो आणि माझे पाय बर्फात घासत घासत पुढे गेलो. एक वाट तयार झाली.

मग पेंग्विन या वाटेवरून माझ्या मागेमागे येऊ लागले.

आम्ही एखाद्या ट्रेनसारखं चालू लागलो.

फक्त गंमत म्हणून.
मी त्यांना एक मोठ्या वर्तुळात फिरवलं.

ते पुन्हा माझ्या मागेमागे येऊ लागले.



मी किनाऱ्यावर गेलो.

पेंग्विनची छोटीशी ट्रेनसुद्धा किनाऱ्यावर आली.

ते एकमेकांशी मित्रत्वाने वागत होते.

पण दगडांच्या ढिगाऱ्याजवळ येताच

ते एकमेकांपासून दूर गेले.



मग त्यांनी मित्रत्वाने वागणं सोडून दिलं.

प्रत्येकजण वेगवेगळ्या जागेवर गेला.

त्यांनी आपलं डोकं आभाळाच्या दिशेत उचललं.

ते मोठ्याने ओरडले *आआआऔआह.*

बऱ्याच पेंग्विननी आपला आवाज यात मिसळला.

प्रत्येकजण रुकरीमध्ये आपापल्या खास जागेवर उभा राहिला.



दगडांच्या मोठ्या ढिगाऱ्यांजवळ आता रोज नवे पेंग्विन येऊ लागले.

मग तिथे शेकडो पेंग्विन झाले. ते सगळे एकमेकांसारखेच दिसत होते.

मला त्यांना वेगवेगळं ओळखता येत नव्हतं.

प्रत्येक पक्ष्यावर एक क्रमांक लावावा, असं मला वाटलं. पेंग्विन घरट्यात असताना त्याला पकडणं खूप सोपं असतं. घरटं हेच त्यांचं घर असतं आणि त्यांची घर सोडायची इच्छा नसते.





पेंग्विनला पकडायची सर्वात योग्य पद्धत म्हणजे त्याच्या मानेला धरायचं आणि त्याचं डोकं आपल्या दोन्ही गुडघ्यांमध्ये ठेवायचं.

पेंग्विन त्याच्या फ्लिपरने आपल्या पायांना खूप जोरात मार देतं.

मी त्याच्या फ्लिपरवर धातुची पट्टी लावली.

त्या पट्टीवर एक क्रंमांक लिहिला होता.

पट्टी पेंग्विनला इजा पोहोचवत नाही.

त्यावरील क्रमांकामुळे मला पेंग्विनची ओळख पटू लागली.

त्यांच्या दगडांच्या ढिगाऱ्यानजिक मी काठ्या रोवल्या. त्यांच्या घरट्यांनाही मी क्रमांक दिले.

मग मला सांगता येऊ लागलं की कोण कुठे राहातो.



पट्टी लावून मी पेंग्विनला सोडून दिलं की ते आपल्या घरट्याकडे पळत होतं.

मग मी पेंग्विनचं निरीक्षण करण्यासाठी खाली बसलो.

मी टेलिस्कोपमधून त्यांचे क्रमांक वाचले.

पेंग्विननी जे जे काही केलं ते ते मी लिहून काढलं.



रुकरीत येणारे पहिले अ‍ॅडेली पेंग्विन नर होते.

नर पेंग्विनला आपल्या घरट्याची जास्त काळजी असते, असं मला जाणवलं.

त्याला स्वत:साठी, आपल्या जोडीदारीणीसाठी आणि त्यांच्या पिलांसाठी एक घरटं हवं होतं.

कुणी घरटं हिसकावण्याचा प्रयत्न केला, तर पेंग्विन पूर्ण ताकदीनिशी लढतो. या लढाईत बहुधा तोच जिंकतो.





मादी पेंग्विन थोड्या दिवसांनंतर आल्या. नर आणि मादी यांची घरट्यानजिक भेट झाली,

तेव्हा त्यांनी एक मोठा आवाज केला.

तो आवाज खडखडाटासारखा होता.

नराने आणि मादीने एकाच वेळी आपली डोकी हलवली.

मग त्यांनी आपापलं घरटं बनवण्यासाठी दगड गोळा केले.

आजवर संशोधकांचा समज होता की नर पेंग्विन मादी पेंग्विनला भेट म्हणून दगड देतो.

पण हे खरं नाही.

नर आणि मादी आळीपाळीने दगड गोळा करतात.

त्यांच्यापैकी एकजण नेहमी घरट्यात राहातो. घरट्यात कुणी नसेल तर,

इतर पेंग्विन दगड चोरून नेतात.

लढताना पेंग्विन आपली मजबूत चोच वापरतात.

ते एकमेकांना आपल्या फ्लिपरने मारतात.





मग एके दिवशी मादीने अंड दिलं.

पेंग्विन ओरडू लागले

आआआऔघ, आआआऔघ, आऔघ.

त्यांनी आपलं डोकं हलवलं.



दोन आठवडे पेंग्विन त्यांची घरटी बनवत होते.

त्यावेळी अंटार्क्टिकात वसंत ऋतू होता.

दिवस आणि रात्र अशा दोन्ही वेळी सूर्य चमकत होता. या काळात पेंग्विननी ना काही खाल्लं, ना ते झोपले.

नर आणि मादी आळीपाळीने त्यांच्या घरट्यावर देखरेख ठेवत होते.

ते एकमेकांच्या जवळ उभे राहात होते.

दोन-तीन दिवसांनी,

मादीने आणखी एक अंड दिलं.

पुन्हा पेंग्विन ओरडू लागले

आआआऔघ, आआआऔघ, आऔघ.

मग नर पेंग्विन अंड उबवण्यासाठी घरट्यात चढला.

पेंग्विनच्या शरीरावर पंख नसलेली एक जागा असते.

त्याला *इनक्युबेशन पॅच (उबवण पिशवी)* म्हणतात.

हा भाग उबदार असतो.

तो अंड्याला ऊब देतो.

दोन अंडी दिल्यावर मादीला भूक लागली.

तिने दोन आठवडे काहीच खाल्लं नव्हतं.

तिचं एकमेव अन्न समुद्रात असतं.

तिने आणखी काही दगड गोळा केले,

आणि नराने ते घरट्यात ठेवले.



मग मादी दूर अंतरावर असलेल्या बर्फाच्या कड्यावर गेली.

अनेक माद्या कड्याच्या टोकावर उभ्या राहिल्या.

थोडी धक्काबुक्की झाली.



अचानक एका मादीने पाण्यात उडी घेतली. मग इतर माद्यांनीसुद्धा उड्या घेतल्या.

कड्याखाली एक धोका होता.

*बिबळ्या सील* मासा समुद्रात त्यांची वाटच बघत होता. पेंग्विनने उड्या घेताच बिबळ्या सील त्यांना पकडून खाऊ लागला.

पण बऱ्याचशा माद्या बचावल्या.

त्या उत्तर दिशेकडे पोहत गेल्या.

त्यांनी समुद्रातल्या छोट्या कोळंबी खाल्ल्या.

या माद्या पुढे जाडजूड होणार होत्या.



नर पेंग्विन घरट्यांवर बसले होते.

अध्येमध्ये वेगवान वारे वाहात होते,

तासाला शंभर मैलपेक्षा जास्त वेगाने.

तरीही नर बसून राहिले -

त्यांच्यावर बर्फ साचला तरीसुद्धा.

दोन आठवडे निघून गेले.

अंडी गरम झाली.

घरट्याचे दगड कुणीही चोरले नाहीत.

नर पेंग्विन बारीक झाला होता.

महिनाभर तो उपाशीच राहिला होता.

तो त्याच्या शरीरातल्या चरबीवर दिवस काढत होता.



अखेर, माद्या परतल्या.

त्या पाण्याच्या आत-बाहेर उड्या मारू लागल्या.

त्या पाण्याच्या वर उड्या मारू लागल्या,

पाण्याच्या खाली पोहू लागल्या,

मग पुन्हा श्वासासाठी पाण्याच्या बाहेर उड्या मारू लागल्या.

शेवटी, त्यांनी बर्फाच्या कड्यावर उड्या घेतल्या आणि ओरडू लागल्या, *आर्क.*

पेंग्विन आपल्या पंखांवर तेल लावतात.

तेल त्यांच्या पंखांवर पाणी साचू देत नाही आणि पंख चमकदारही दिसतात. हे तेल त्यांच्या शेपटीच्या वर असलेल्या एका खास जागेतून (ग्रंथीतून) येतं.

पेंग्विन आपल्या चोचीने या ग्रंथीला घासतात, मग चोची पंखांना घासतात.

याला *प्रीनिंग* असं म्हणतात.





मादी घरट्याकडे पोहोचली आणि अचानक पळू लागली, ओरडू लागली.

तिच्या जोडीदाराने तेवढ्याच कर्कश आवाजात तिला प्रतिसाद दिला.

सगळ्या पेंग्विनचा एकत्रित आवाज मैलभर अंतरावरूनही ऐकता येईल इतका मोठा होता.

त्यांनी आपलं डोकं हलवलं.

ते घरट्यापुढे, त्यातल्या अंड्यांपुढे वाकले.

नर पेंग्विनने हळूच आपले पाय उचलले आणि तो घरट्यापासून दूर गेला.

तो थकल्यासारखा, अंग आखडल्यासारखा दिसत होता.

मादीने लगेच अंड्यांना झाकलं. आता नर समुद्रावर जाऊ शकेल आणि काही खाऊ शकेल.

त्याने आणखी दगड गोळा केले, मग मादीकडे पाहून आपलं डोकं हलवलं.

सगळे नर समुद्रकिनारी गोळा झाले.

त्यांनी पाण्यात उड्या मारताना बिबळ्या सीलपासून स्वत:चा बचाव करण्याची काळजी घेतली.

पेंग्विनला स्नानाची आणि भरपूर कोळंबी खाण्याची गरज होती.

पेंग्विनने पस्तीस दिवस अंडी उबवली.

मग अंडी उबून फुटली.

प्रत्येक घरट्यात आवाज येऊ लागला.

पिल्लं अंड्याला छोटंसं भोक पाडून बाहेर येऊ लागली.

पेंग्विनची पिल्लं अंड्यातून बाहेर आली तेव्हा बारीक लव असलेल्या राखाडी चेंडुसारखी दिसत होती.

पेंग्विनचं पिल्लू हातात सहज धरता येतं.

ते आवाज करतात.

त्यांना अन्न हवं असतं.





पिता पेंग्विन समुद्रावरून परतले.

त्याचं पोट अन्नाने भरलं होतं.

पिल्लाने आवाज केला आणि ते अन्नासाठी वर पोहोचलं.

त्याने आपली छोटीशी चोच पित्याच्या चोचीत घुसवली.

नर पेंग्विनने आपल्या पोटातलं अन्न जोर लावून वर आणलं.

पिल्लाने ते अन्न लगेच मटकावून टाकलं.

मग पिल्लू झोपून गेलं.

तेवढ्यात, दुसऱ्या अंड्यातून एक पिल्लू बाहेर पडलं.

तेसुद्धा भुकेलं होतं.



आता मादी पुन्हा समुद्रावर गेली.

ती परतली तेव्हा,

तिचं पोट अन्नाने पूर्ण भरलं होतं.

तिने पिल्लांना ऊब देण्यासाठी त्यांना पंखाखाली झाकलं.

त्यांनी आवाज केला, अन्न मागितलं,

तेव्हा तिने त्यांना भरवलं.

पिल्लं तीन आठवड्यांची झाली,

तेव्हा जास्त अन्न आणण्यासाठी दोघे पालक समुद्राकडे धावले.

आता पिल्लं एकटीच राहिली.

त्यांच्या सुरक्षेसाठी तिथे कुणी मोठं पेंग्विन नव्हतं.



दक्षिण ध्रुवीय *स्कुआ*सुद्धा भुकेला होता.

स्कुआ हा एक मोठा पक्षी आहे.

त्याचे पंख तब्बल पाच फूट लांब पसरतात.

तो मासे, सागरी प्राणी, पेंग्विनची अंडी
आणि पेंग्विनच्या पिल्लांना खातो.

स्कुआ हा तसा हिंस्र पक्षी नाही.

तो फक्त भुकेला होता.

त्यालासुद्धा त्याच्या पिल्लांना अन्न
भरवायचं होतं.

पेंग्विनची पिल्लं कळप करून राहिले.

त्यांच्या कळपाला *क्रेच* म्हणतात.

एकत्र राहिल्यामुळे ते सुरक्षित होते.

मोठ्या कळपात पिल्लांना ऊबसुद्धा मिळाली.

मातापिता परतल्यावर,

त्यांनी पिल्लांना हाक दिली.

राखाडी बारीक लव असलेल्या दोन चेंडुंनी उडी मारली.

ते घरट्यात परतले. तिथे त्यांना अन्न मिळालं.

काही इतर पिल्लंसुद्धा त्यांच्यासोबत आली.

पण मोठ्या पेंग्विनने फक्त स्वत:च्याच पिल्लांना अन्न भरवलं.

मला हे कळू शकलं, कारण अंडी फोडून बाहेर आलेल्या पिल्लांना ओळखण्यासाठी मी त्यांच्या फ्लिपरवर पट्ट्या बांधल्या होत्या.

त्यामुळे कोणतं पिल्लू कोणत्या मात्यापित्याचं आहे, हे मला ओळखता येत होतं.



पाच आठवड्यांनंतर पिल्लं खूप जाडजूड झाली.

त्यांचं पोट जमिनीला घासू लागलं.

ते आपल्या वजनाइतकं खाऊ शकत होते.



पिल्लं सात-आठ आठवड्यांची झाल्यावर,
मोठे पेंग्विन पोट भरायला समुद्रावर गेले.
ते परतले नाहीत.

पिल्लं अगदी एकाकी झाली.

हिवाळा जवळ आला.

थंडी पडू लागली.
वेगवान वारे वाहू लागले.

आता पिल्लं काय करणार?

त्यांचं एकमेव अन्न तर समुद्रात होतं.



पिल्लं खाली समुद्रकिनारी जाऊ लागली.

ते धावू लागले,

तसे त्यांचे छोटे बारीक लव असलेले पंख बंद झाले.

आधी पिल्लं राखाडी दिसत होती.

आता ती मोठ्या पेंग्विनसारखी काळीपांढरी दिसू लागली.

आपल्या मात्यापित्यांसारखी ती पंखांना तेल लावू लागली.

त्यांनी खूप तेल लावलं.

त्यांनी आपले फ्लिपर फडफडवले.

आता ते समुद्रावर जायला सज्ज झाले.

समुद्राच्या लाटा मोठ्या आणि भयावह होत्या.

पिल्लांनी मंद *आर्क* आवाज केला.

हा आवाज त्यांच्या जाण्याचा संकेत होता.



बर्फाचा एक मोठा तुकडा तरंगत
किनाऱ्यावर वाहात आला.

अचानक पिल्लांनी पाण्यात उडी मारली.

पोहत ते त्या बर्फाकडे जाऊ लागले.

आणि एक दुर्घटना घडली.

लाटांनी त्यांना बुडवलं.

काही पिल्लं परतली.

काही मेटाकुटीने बर्फाच्या तुकड्यावर
चढली
आणि हळूहळू समुद्रात जाऊ लागली.

थोड्या वेळातच, इतर पिल्लंही त्यांच्या
मागोमाग गेली.



आता पिल्लं काही वर्ष पॅक आइस प्रदेशात राहातील.

काही काळानंतर ते सगळे रूकरीमध्ये परततील.

तेव्हा ते स्वत:च्या पिल्लांचं संगोपन करण्याइतपत मोठे झालेले असतील.





पुढल्या वसंतऋतुची आणि पेंग्विन परतण्याची मी सात महिने वाट बघितली. पट्ट्या लावलेले शेकडो पेंग्विन पुन्हा आपल्याच रूकरीत परततात का, हे मला पाहायचं होतं.

ते त्याच घरट्यात, त्याच जोडीदारासोबत आणि शेजाऱ्यांसोबत राहातील का?





एक कळप येताना दिसला!

काही पिल्लांच्या अंगावर लावलेल्या पट्ट्या दिसू लागल्या, टेलिस्कोपमधून.

यावेळीसुद्धा नर पेंग्विनच सर्वात आधी येत होते.

मी खडकांच्या आणि बर्फाच्या ढिगाऱ्यामागे लपलो. पट्ट्या लावलेले पेंग्विन कुठे जात होते, हे पाहू लागलो.

नवलच घडलं! नर त्याच जागी परतले, जिथे वर्षभरापूर्वी त्यांनी घरटी बांधली होती.
मी माझे नकाशे आणि नोंदवही तपासून बघितलं.

आपल्या जुन्या घरट्यांमध्ये परतल्यावर नर उत्तेजित झाले.

घरट्याजवळ उभ्या असलेल्या इतर नरांशी त्यांनी झगडा केला.

त्यांनी खूप गोंगाटसुद्धा केला!

त्यांना परतल्याचा आनंद झालेला दिसला.

काही दिवसांनी, माद्यासुद्धा त्या बर्फाळ किनाऱ्यावर परततील.

त्यासुद्धा आपल्या जुन्या घरट्यांकडे धाव घेतील आणि आपल्या जोडीदाराला शुभेच्छा देतील.

त्या मोठ्या आवाजात ओरडतील *आऔघ.*

आणि मग, आळीपाळीने, नर आणि मादी आपलं घरटं पुन्हा बांधायला सुरुवात करतील.



## डॉ. आर. एल्. पेनी

ॲडेली पेंग्विनचा अभ्यास करण्यासाठी डॉ. पेनी यांनी अंटार्क्टिकाच्या पाच सफरी केल्या. त्यांनी तिथे एकेचाळीस वर्षे वास्तव्य केले.

त्यांनी ब्रॉँक्स प्राणीसंग्रहालयातील न्यूयॉर्क झुलॉजिकल सोसायटीतही या पेंग्विनचा अभ्यास केला. त्यांनी पेंग्विनच्या हालचाली, वर्तन आणि आवाज यांचा अर्थ तसेच एका ठिकाणाहून दुसरीकडे जाण्याचा मार्ग ते कसा शोधतात, हे जाणून घेण्याचा प्रयत्न केला.

ते अंटार्क्टिकाला जाण्याची आणखी एक सफर आयोजित करत आहेत. यावेळी त्यांना पाणबुडीद्वारे खोल पाण्यात असलेल्या पेंग्विनचा अभ्यास करायचा आहे.

समाप्त